**राज्यात औद्योगिक पायाभूत सुविधांची निर्मिती व विकासासंदर्भात प्राप्त प्रस्तावांकरिता निधी उपलब्ध करुन देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, उर्जा व कामगार विभाग**
**शासन ज्ञापन क्र. सुसंबै-२०१४/प्र.क्र.५३/उद्योग-२**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ३१ मार्च, २०१५.

<u>संदर्भ</u> १) उद्योग ऊर्जा व कामगार विभाग शासन निर्णय क्र. आयआयआय -पॉलीसी २०१०/ प्र.क्र.७६८/उद्योग-२, दिनांक २२ फेब्रुवारी, २०१३

२) उद्योग ऊर्जा व कामगार विभाग शासन निर्णय क्रमांक: औपासू-२०१२/ प्र. क्र. २३४/ उद्योग-२, दि. २५ फेब्रुवारी, २०१४.

३) उद्योग ऊर्जा व कामगार विभाग कार्यालयीन आदेश क्रमांक: सुसंबै -२०१२/ प्र. क्र. ५३/ उद्योग-२, दिनांक २९ मार्च, २०१४.

४) दिनांक १९ डिसेंबर, २०१४ रोजी झालेल्या सुकाणू समितीच्या दुसऱ्या बैठकीचे इतिवृत्त दिनांक ०६ जानेवारी, २०१५.

५) उद्योग ऊर्जा व कामगार विभाग शासन ज्ञापन क्र. सुसंबै -२०१२/ प्र. क्र. ५३/उद्योग-२, दि. २८ जानेवारी, २०१५

**ज्ञापन:**

राज्यात औद्योगिक पायाभूत सुविंधांची निर्मिती व विकास या योजनेअंतर्गतमा. मुख्य सचिवांच्या अध्यक्षतेखालील "महाराष्ट्र औद्योगिक पायाभूत सुविधा विकास समिती" च्या दिनांक २०/०३/२०१४ व दिनांक १९/१२/२०१४ रोजी झालेल्या बैठकीत दिलेली मान्यता विचारात घेऊन, निधीच्या उपलब्धतेनुसार सोबतच्या विवरणपत्रात नमूद केलेल्या ६ (सहा) प्रस्तावांना एकूण रु. १०५,००,००,००० /- (एकशे पाच कोटी फक्त ) इतकी रक्कम विकास आयुक्त(उद्योग) यांनी आहरण करुन महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ या कार्यान्वयन यंत्रणेकडे सुपुर्द करण्यास, खालील अटींच्या अधीन राहून शासन याव्दारे मान्यता देत आहे.

१) सदर प्रकल्पांचे नकाशे व अंदाजपत्रकास महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाने तपासणी करुन देण्यात आलेल्या तांत्रिक मान्यतेच्या अधीन राहील.

२) सोबतच्या विवरणपत्रात नमूद केलेल्या खर्चाचे काम पूर्ण होईपर्यंत झालेल्या प्रकल्पाच्या खर्चातील वाढ (Cost Escalation) महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाने स्वत:च्या निधीतून उपलब्ध करुन कामे पूर्ण करणे आवश्यक राहील.

३) सोबतच्या प्रपत्रातील प्रकल्पाच्या एकूण प्रशासकीय मान्यतेच्या खर्चाच्या ५० % निधी उद्योग विभागाकडून टप्प्याटप्प्यात वितरीत करण्यात येईल. ५०% निधी महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाने स्वत:च्या निधीतून खर्च करावा.

४) शासनाकडून पायाभूत सेवांसाठी निधी उपलब्ध करुन देण्यात येत असल्याने सोबतच्या विवरणपत्रातील प्रकल्पांपैकी CEPT, पाणी पुरवठा अशा सेवांसाठी प्रमाणानुसार (proportionately) MIDC ने User Charges कमी करणे आवश्यक राहील.

५) सोबतच्या विवरणपत्रातील प्रकल्पांवर अन्य कोणताही विभाग अथवा संस्थांकडून खर्च झालेला नाही याची खातरजमा कार्यान्वयन यंत्रणेने (महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाने) करुन घ्यावी.

६) सदर प्रकल्पाचे काम पूर्ण झाल्यानंतर पुढील देखभाल करण्याची जबाबदारी संबंधित कार्यान्वयन यंत्रणा /स्थानिक संस्था यांची राहील. त्यासाठी शासनाकडून कोणतेही अनुदान देण्यात येणार नाही. याबाबत संबंधित यंत्रणेकडून लेखी हमी महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाने घ्यावी.

७) शासन निर्णय क्र. औपासू-२०१२/प्र.क्र.२३४/उद्योग-२, दिनांक २५/०२/२०१४ मधील कार्यपध्दती व मार्गदर्शक तत्वांचे पालन आहरण व संवितरण अधिकारी व कार्यान्वयन यंत्रणा यांनी कराव्यात.

८) कार्यान्वयन यंत्रणांना उपलब्ध करुन देण्यात आलेला निधी संदर्भात प्रकल्पनिहाय उपयोगिकता प्रमाणपत्र व कामाचा पूर्तता अहवाल विकास आयुक्त (उद्योग) यांनी शासनास सादर करावा.

९) विकास आयुक्त (उद्योग) यांनी ३१/०३/२०१५ पर्यंत खर्च होणारा निधी कोषागरे मधून काढावा व जास्तीचा निधी कोषागरे मधून काढून महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ किंवा इतर स्थानिक संस्थाकडे जमा करु नये

२. ही शासन मान्यता संदर्भीय क्र. ५ येथे नमूद केलेल्या सुकाणू समितीच्या दिनांक १९/१२/२०१४ रोजी झालेल्या बैठकीमध्ये प्राप्त मंजूरी व सदरहू बैठकीतील सूचनांनुसार अवलंबवायच्या कार्यपध्दती तसेच उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग शासन निर्णय क्र. औपासू-२०१२/प्र.क्र.२३४/उद्योग-२, दिनांक २५/०२/२०१४ मधील तरतुदीच्या अधीन राहील. कार्यान्वयन यंत्रणेने व आहरण व संवितरण अधिकारी यांनी सदर तरतुदीप्रमाणे कार्यवाही करावी.

३. सदर कामासाठी येणारा खर्च लेखाशीर्ष. क्र. के-१०, मुख्य लेखाशीर्ष ४८७५-इतर उद्योगावरील भांडवली खर्च, उपलेखाशीर्ष ६०-इतर उद्योग, ८०० इतर खर्च, ८०० (००) (०१) औद्योगिक पायाभूत सुविधांचा विकास व निर्मीती (योजनांतर्गत) (४८७५-००२५) या योजनेखाली वित्तिय वर्ष २०१४-२०१५ करिता मंजूर असलेल्या निधीमधून भागविण्यात यावा.

४. सदर प्रकल्पांची सुरुवात सन २०१४-१५ या आर्थिक वर्षापासून करण्यात यावी.

५ . प्रस्तावित प्रकल्पांचे सन २०१४- २०१५ करिता करावयाच्या खर्चाचे नियोजन व त्यासाठी शासनाच्या पायाभूत सुविधांची निर्मिती व विकास यासाठीच्या निधीतून द्यावयाच्या रकमेचा तपशील सोबत जोडलेल्या विवरणपत्राप्रमाणे असेल .

६. परिच्छेद ५ मध्ये नमूद केलेल्या प्रस्तावांना एकूण रु. १०५,००,००,००० /- ( एकशे पाच कोटी फक्त) एवढया रकमेच्या आहरणाचे आणि महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाला वितरीत करण्याचे अधिकार विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई यांचे कार्यालयातील लेखाधिकारी यांना देण्यात येत आहेत.

७. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई यांना कळविण्यात येते की, सदर रकमांचे धनादेश मुख्य लेखाधिकारी, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ यांचे नावे काढून मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ, मुंबई यांना अदा करण्यात यावे.

८. या शासन ज्ञापनान्वये मंजूर केलेल्या रकमेचे उपयोगिता प्रमाणपत्र महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ यांजकडून प्राप्त करुन, विकास आयुक्त (उद्योग) यांनी शासनास सादर करावे.

९. हे ज्ञापन नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. १०३/१४६१, दिनांक २७/०२/२०१५ व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.१५७/१५/ व्यय-१६, दिनांक १३/०३/२०१५ अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे .

१०. सदर शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आले असून, त्याचा संकेतांक २०१५०३३११२०७५३३९१० असा आहे. हे शासन ज्ञापन डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे .

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने .

Venkatesh
Hanamantrao
Kulkarni

Digitally signed by Venkatesh Hanamantrao Kulkarni
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=6c45807d6643737585e13204d4be0f3ed1b0f2e62806f55857f2a7ad678caa4d, cn=Venkatesh Hanamantrao Kulkarni
Date: 2015.04.16 17:14:33 +05'30'

**( व्यं. ह. कुलकर्णी )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रति:**

१) महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरीक्षण), मुंबई.
२) महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरीक्षण), नागपूर.
३) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
४) निवासी लेखा परीक्षण अधिकारी, मुंबई.
५) विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई- ४०० ०३२.
६) मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ
७) मुख्य लेखाधिकारी, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ, मुंबई.
८) वित्त विभाग, (कार्यासन अर्थसंकल्प-१४/ व्यय-१६ ), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
९) नियोजन विभाग, (कार्यासन-१४६१), मंत्रालय, मुंबई.

१०) कक्ष अधिकारी, (प्रशासन-१) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मुंबई-४०० ०३२.

११) निवड नस्ती (उद्योग-२)

| उद्योग ऊर्जा व कामगार विभाग शासन ज्ञापन क्र. सुसंबै-२०१४/प्र.क्र.५३/उद्यो`ग-२, दिनांक ३१/०३/२०१५ चे सोबतचे विवरणपत्र | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **अ. .क्र** | **पायाभूत सुविधा प्रकल्पांचा तपशील** | **कार्यान्वयन यंत्रणाने दिलेल्या तांत्रिक मान्यतेची रक्कम (रु. लाखात)** | **सक्षम प्राधिकाऱ्याकडून प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली रक्कम (रु. लाखात)** | **सुकाणू समितीने मान्यता दिल्यानुसार पायाभूत निधीतून द्यावयाची रक्कम (रु. लाखात)** | **सन २०१४-१५ साठी वितरीत करावयाची रक्कम (रु. लाखात)** |
| **I** | **II** | **III** | **IV** | **V** | **VI** |
| .१ | रोहा औद्योगिक क्षेत्र -सध्या अस्तित्वात असलेल्या अरीखुर्द Effluent Disposal Point पासून शेवटच्या टप्प्यापर्यंत ६३० MM Dia HDPE line & diffuser उपलब्ध करणे | २८२९.२२ | २८२९.२२ | १४१४.६१० (५०%) | १४००.००० (१४ कोटी) |
| .२ | राजीव गांधी इन्फोटेक पार्क, हिंजेवाडी - चांदे फाटा ते घोटावाडा फाटा रोड पर्यत पायाभूत सुविधा रस्ते इत्यादी उपलब्ध करुन देणे. | २५२.४४ | २५२.४४ | १२६.२२० (५०%) | १००.००० (१ कोटी) |
| ३. | नागपूर (हिंगणा) औद्योगिक क्षेत्र - सेंट्रल एमआयडीसी रस्त्याला Asphaltic Treatment देणे. **(MIDC)** | ७३८.२८ | ७३८.२८ | ३६९.१४० (५०%) | १००.००० (१ कोटी) |
| ४. | उमरेड औद्योगिक क्षेत्र - ७.५ मीटर आणि ५.५ मीटर रुंदीच्या रस्त्याचे बांधकाम करणे व ZP रोडचे डांबरीकरण **.(MIDC)** | ८८९.६९ | ८८९.६९ | ४४४.८४५ ५०% | २००.००० (२ कोटी) |
| ५. | राजीव गांधी इन्फो टेक पार्क, हिंजेवाडी, पुणे - ६.२० कि.मी. लांबीचे ६ पदरी रोड आणि मुळा नदीवर १२० मी. लांबी X २७.२० मी. रुंदीचा पुल बांधणे व इतर कामे . **(MIDC)** | १०६६५.५२ | १०६६५.५२ | ५३२२.७६० (५०%) | ४०००.००० (४० कोटी) |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| ६. | अतिरिक्त अमरावती औद्योगिक क्षेत्र टेक्सटाईल पार्क येथे ५ MLD क्षमतेचे CETP पुर्नप्रक्रिया २.५ MLD सह, विल्हेवाट यंत्रणा, CETP आवारातील SCADA आणि इंन्फ्रास्ट्रक्चर पुरविण्याबाबत **(MIDC)** | ९५३९.२६ | ९५३९.२६ | ४७६९.६३० (५०%) | ४७००.००० (४७ कोटी) |
| | **एकूण** | **२४९१४.४१** | **२४९१४.४१** | **१२४४७.२०५** | **१०५००.००० (१०५ कोटी)** |